पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातंर्गत "क" वर्ग नस्त्या स्कॅन करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संगणक-२०२२ / प्र.क्र.२७ /संगणक शाखा**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग मुंबई ४०० ००१
तारीख: १ जून, २०२३

**प्रस्तावना :-**

शासनाने ई-ऑफीस प्रणालीचा वापर करण्याबाबत दिलेल्या सुचनेनुसार विभागामार्फत कार्यवाही करण्यात येत आहे. या कार्यवाहीमध्ये अभिलेखाचे संगणीकीकरण Digitization करण्याकरीता "अ" व "ब" वर्ग तसेच कार्यवाही सुरु असलेल्या नस्त्यांचे स्कॅनिंग करुन घेण्यात आले आहे. स्कॅनिंग केलेल्या अभिलेखाचे संगणकामध्ये अभिलेख जतन करणे, त्यास अनुक्रमाणिका देणे, सर्व्हर किंवा क्लाऊडवर अभिलेख अपलोड करणे, तसेच स्कॅनिंग ॲप्लीकेशनच्या माध्यमातून सर्व्हर किंवा क्लाऊडमधुन स्कॅन केलेला संग्रहीत दस्ताऐवज वापरता येणे असा रोडमॅड तयार करण्यात आला आहे. दिनांक ३०.०५.२०२३ रोजी प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीमध्ये विभागातील आवश्यक क वर्ग नस्त्या स्कॅन करुन "अ" व "ब" वर्ग नस्ती प्रमाणेच रोडमॅप करून जतन करण्यास समितीने मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन या कामकाजासाठी होणारा खर्चाकरीता प्रशासकीय मान्यता देण्यासाठीची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासनाने ई-ऑफीस प्रणालीचा वापर करण्याबाबत दिलेल्या सुचनेनुसार विभागामार्फत कार्यवाही करण्यात येत आहे. या कार्यवाहीमध्ये अभिलेखाचे संगणकीकरण Digitization करण्याकरीता "अ" व "ब" वर्ग तसेच कार्यवाही सुरु असलेल्या नस्त्यांचे स्कॅनिंग करुन घेण्यात आले आहे.

२. दिनांक ३०.०५.२०२३ रोजी प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीमध्ये विभागातील आवश्यक "क" वर्ग नस्त्या स्कॅन करुन "अ" व "ब" वर्ग नस्ती प्रमाणेच रोडमॅप करून जतन करण्यास समितीने मान्यता दिली आहे. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. "वाय-५-३४५१ सचिवालय आर्थिक सेवा (००) ०९० सचिवालय (०२) पाणी पुरवठा स्वच्छता विभाग (०२) (०२) ई-गव्हर्नन्स कार्यक्रमाची अंमलबजावणी

(कार्यक्रम) (३४५१ २७६४)-१७ “संगणक खर्च” या लेखाशिर्षाखाली, सन २०२३-२४ मधील मंजूर अर्थसंकल्पीत तरतुदीमधून भागविण्यात येणार आहे.

३. याबाबतचा अंदाजित खर्च रू. १०.०० लक्ष रकमेपेक्षा अधिक असल्याने सदर काम उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. २०१६/प्र.क्र. २१५/उद्योग-४ दिनांक २४.०८.२०१७ मध्ये नमुद केल्याप्रमाणे व Gem पोर्टल वरील विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करुन करण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग दोन मधील अनुक्रमांक २७ ब नियम क्र. ७६ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार खरेदी करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०६०११४४४३५३३२८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY VITHOBA KALBHOR

Digitally signed by SANJAY VITHOBA KALBHOR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=f38e777689de3b7f0254b419127daa9612b470f287aa6310645bf8f39ddb6811, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DF8236826D559FF6F7F76F1D6D59C70C92E9C010F48017078D824BE6D2B5B8D1, cn=SANJAY VITHOBA KALBHOR
Date: 2023.06.01 16:38:50 +05'30'

**(संजय काळभोर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत**,

१. महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपुर,
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ( रोखशाखेमार्फत),
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
४. वित्त विभाग, (व्यय-६) मंत्रालय, मुंबई,
५. सह सचिव (संगणक शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. अवर सचिव (रोखशाखा ), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. निवडनस्ती, संगणक शाखा.